GR-2004080412522600[illegible]

इंदिरा आवास योजनेंतर्गत घरकुल मंजूर करण्यासाठी लाभार्थ्यांची निवड करणेबाबत निकष.

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.इंआयो-1098/प्र.क्र.52/जल-17
मंत्रालय, मुंबई 400 032. दिनांक 12 मे, 1998.

वाचा:- 1. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्रमांक.एलआरडब्ल्यू-1086/सीआर 3555/र-12, दिनांक 21 मे, 1987.

2. शासन परिपत्रक, नियोजन विभाग, क्रमांक.आरएलजी-1487/सीआर 255/आरएलजी 2, दिनांक 7 ऑगस्ट, 1987.

3. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्रमांक.एलआरडब्ल्यू-1086/सीआर 3555/र-12, दिनांक 28 डिसेंबर, 1987.

4. शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक.जरोयो 1093/प्र.क्र.73/जल 21, दिनांक 7 मार्च, 1994.

5. केंद्र शासनाचे इंग्रजी अ.शा.प.क्र.11024/1/97 आरएच, दिनांक 3 मार्च, 1998.

प्रस्तावना:- केंद्र पुरस्कृत इंदिरा आवास योजनेंतर्गत ग्रामीण भागातील दारिद्र्य रेषेखालील अनुसूचित जाती/जमातीतील व्यक्तींना आणि मुक्त वेठबिगारांना तसेच दारिद्र्य रेषेखालील मागासेत्तर व्यक्तींना घरकुले उपलब्ध करुन देण्यात येतात.

या योजनेंतर्गत लाभार्थ्यांच्या निवडीच्या संबंधाने वरील संदर्भ क्र.1 ते 4 शासन परिपत्रकान्वये शासनाने पूर्वी दिलेल्या सूचनात व आदेशात बदल करुन वरील क्र.5 येथील संदर्भाधीन केंद्र शासनाचे इंग्रजी अ.शा. प.क्र.11024/1/97-आरएच, दिनांक 3 मार्च, 1998 च्या अनुषंगाने शासन लाभार्थी निवडीबाबत पुढील प्रमाणे सुधारित आदेश देत आहे.

शासन निर्णय:- जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणानी त्यांचे जिल्ह्यांसाठी आर्थिक वर्षात मिळालेल्या नियतव्यय व उद्दिष्टांच्या आधारे ग्रामपंचायतनिहाय घरकुलांचे उद्दिष्ट निश्चित करुन संबंधित ग्रामपंचायतीना तसे सूचित करावे. त्यानंतर, संबंधित ग्रामपंचायतींना दिलेल्या उद्दिष्टांचे अधीन राहून संबंधित ग्रामसभांनी केंद्र शासनाने लाभार्थ्यांच्या निवडीबाबत दिलेल्या मार्गदर्शक सूचना व अग्रक्रमाच्याआधारे पात्र कुटुंबापैकी योग्य लाभार्थ्यांची निवड करावी. यात पंचायत समितीच्या मान्यतेची गरज नाही. मात्र, संबंधित पंचायत समितींना निवड केलेल्या लाभार्थींची यादी माहितीसाठी पाठवावी.

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणानी ग्रामपंचायतनिहाय उद्दिष्ट ठरवितांना खालील पध्दत अनुसरावी.:-

1) जिल्ह्याला प्राप्त झालेले उद्दिष्ट आणि नियतव्ययाचे अधीन राहून पंचायत समिती निहाय उद्दिष्ट अनुसूचित जाती/जमातींची लोकसंख्या यांच्या प्रमाणात निश्चित करावे.

2) याआधारे पंचायत समिती निहाय निश्चित झालेल्या उद्दिष्टाच्या अधीन राहून संबंधित पंचायत समितीत गणनिहाय (Panchayat Samiti Electoral Collegewise) उद्दिष्ट याच धर्तीवर निश्चित करावे.

3) गणवार उद्दिष्ट निश्चित झाल्यानंतर त्यागणात, ज्या ग्रामपंचायतीत मुक्त वेठबिगार व दारिद्र्य रेषेखाली अनुसूचित जाती/जमातीचे कुटुंबाची संख्या जास्त आहे, त्या ग्रामपंचायतींना सर्वप्रथम अग्रक्रमाने उद्दिष्ट दयावे. त्यानंतर, ज्या ग्रामपंचायती क्षेत्रात पाणलोट आधारित जलसंधारण कार्यक्रम घेण्यात आला आहे आणि जेथे दारिद्र्य रेषेखालील कुटुंबांची संख्या जास्त आहे, त्या ग्रामपंचायतींना प्राधान्य दयावे.

4) ज्या ग्रामपंचायतीत दारिद्र्य रेषेखाली कुटुंबाची संख्या जास्त आहे, परंतु त्यांना अद्यापपावेतो या योजनेचा फायदा अजिबात मिळाला नाही, अशा गांवाना प्राधान्य दयावे.

5) केंद्र शासनाच्या सूचनेप्रमाणे कमीत कमी 60 टक्के खर्च अनुसूचित जाती/जमातीवर होणे आवश्यक असून या वर्गातून पात्र कुटुंबापैकी प्रथम प्राधान्याने लाभार्थीची निवड करावी. अनुसूचित जातीतर/जमातीतर वर्गासाठी 40 टक्केपेक्षा जास्त खर्च होऊ नये याची खातर जमा जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी करावी.

6) ग्रामपंचायतींना उद्दिष्ट दिल्यानंतर ग्रामसभेमार्फत निवड झालेल्या लाभार्थीची यादी तपासून ती पात्र लाभार्थीपैकीच आहे याची शहानिशा जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणानी करून घ्यावी व अपात्र कुटुंबाना या योजनेचा लाभ मिळणार नाही याची दक्षता घ्यावी.

7) ग्रामसभेमार्फत निवड झालेल्या लाभार्थी कुटुंबाची पात्रतेबाबत खात्री केल्यानंतर निवड यादीबाबत जिल्ह्याचे पालकमंत्री यांची सहमती घेऊन संबंधित कुटुंबाची यादी संबंधित ग्रामपंचायतीना सुचित करावी.

8) ग्रामसभेने पात्र कुटुंबापैकी निवड केलेल्या लाभार्थ्यांच्या यादीला जिल्हा स्तरावर कोणत्याही प्रकारे बदल होणार नाही याची दक्षता जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी घ्यावी.

9) केंद्र शासनाकडून उद्दिष्ट प्राप्त झाल्यानंतर संबंधित जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी वरीलप्रमाणे ग्रामपंचायत निहाय उद्दिष्ट निश्चित करुन संबंधित ग्रामपंचायतीना कळवून, ग्रामसभेमार्फत निवड झालेल्या पात्र कुटुंबांची यादी वेळेवर ग्रामपंचायतींना द्यावी जेणेकरुन लाभार्थीमार्फत घरकुलाचे बांधकाम वेळेवर हाती घेऊन विहीत मुदतीत ते पूर्ण करणे शक्य होईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशाने व नावाने,

(डी. आर. परिहार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
अतिरिक्त मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
शासनाचे सर्व सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
उप सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ विभाग, जरोयो समिती,
संचालक, समाजकल्याण महाराष्ट्र राज्य, पुणे,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी विकास, नाशिक,
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य 2, नागपूर,
सर्व अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती,
कार्यासन क्र. 12, महसूल व वन विभाग,
निवड नस्ती, जल 17.